GR2004,0930144836001-120)

**जलबांध - जलसंधारणाचा एक उपचार म्हणून अंतर्भाव करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.बंधारा १००४/१२६/प्रक्र.६०/जल-१,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०२ एप्रिल , २००४.

वाचा:- १) जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. जजसं १०९२/सीआर १८२/जल - ७ दि. ५ ऑगस्ट १९९२.
२) जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. जजसं १०९५/प्र.क्र.२५०/ जल - ७ दि. ३०.१.१९९६
३) पाटबंधारे विभाग शासन परिपत्र क्र. संकिर्ण १०८९/३३७/लपा-२ दि.१२ एप्रिल १९९१
४) मुख्य अभियंता ल.पा.(स्था.स्तर) पुणे यांचे पत्र क्र.मुअ/उविअ.२/प्रशा-२/जलबांध/१०९८/०४ दि.२०.३.०४

**प्रस्तावना** :- पाणलोट क्षेत्र विकासासाठी मृद् व जलसंधारणाचे उपचार म्हणून पाझर तलाव, कोल्हापूर पध्दतीचे बंधारे, नालाबांध, सिमेंट बांध, गावतलाव वनतलाव इ. बांधकामे वेगवेगळ्या योजनांतर्गत (रोहयो, संपूर्ण ग्रामीण रोजगार योजना इ.) हाती घेऊन राबविण्यात येतात. या सर्व योजनाद्वारे पृष्ठभागावर पाण्याचे साठे निर्माण करुन ते पाणी जमिनीत मुरवून भूजलाचे पुनर्भरण केले जाते.

कोल्हापूर पध्दतीच्या बांधासाठी लाकडी दरवाजाऐवजी ( बर्गे ) २ x ०.५ मीटर आकाराचे सरळ/वक्र दरवाजे एकावर एक बसवून जास्तीत जास्त ४.५ मीटर उंचीपर्यंतची पाणी साठविण्याची व्यवस्था केली जाते. या बंधा-यामध्ये दरवाजे बसविण्याची व उघडण्याची प्रक्रिया ही पूर्णपणे मनुष्य शक्तीद्वारे हाताळली जाते. हे दरवाजे दगडी या संधानकातील प्रस्तंभामध्ये अडकविण्याची तरतूद करावी लागते. Waterway मधील encroachment, बंधा-याची जास्त उंची, अकस्मात आलेल्या पूरप्रसंगी दरवाजे उघडण्याची अडचण व लागणारा वेळ इ. प्रमुख कारणामुळे राज्याच्या अनेक भागात कोल्हापूर पध्दतीचे बंधारे एका बाजूने वळण घेऊन (outflank) फुटण्याचा प्रकार सातत्याने घडत असल्याचे निदर्शनास येत आहे. या बंधा-याचे दरवाजे बसविण्यासाठी व उघडण्यासाठी जास्त वेळ लागतो, काम अवघड असते व खर्चही जास्त येतो. या अडचणींवर मात करुन बंधा-याच्या व्यवस्थापनात सुटसुटीतपणा आणण्याच्या दृष्टीने शासनाचे प्रयत्न सतत चालू आहेत. त्यातीलच एक उपाय म्हणून शासन खालील निर्णय घेत आहे.

शासन निर्णय :- कोल्हापूर पध्दतीचे बंधारे आणि तत्सम इतर प्रकारचे बंधारे (सिमेंट बांध इ.) यातील बहुतांशी त्रुटी दूर करुन जलसंधारणाची परिणामकारकता वाढविण्यासाठी शासन जलबांध या बांधा-याला यापुढे पाणलोट क्षेत्र विकासाच्या कामामध्ये जलसंधारणाचा एक उपचार म्हणून अंतर्भाव करण्यास मान्यता देत आहे. या बांधाची उंची १.२ मीटर असेल. लोखंडी दरवाजे २X१.२ मी आकाराचे असतील व ते तळात गुंतविलेले (hinged) असतील. ज्या ठिकाणी नदीचे पात्र सरळ, कठीण व मजबूत

(defined) असेल त्या ठिकाणी अशा जलबांधाची साखळी निर्माण करुन दरवाजाच्या पाठीमागे पाणी अडवून भूजलाचे पुनर्भरण करुन त्याद्वारे पिण्याचे पाणी, सिंचनाचे पाणी इ. साठी पाण्याची उपलब्धता वाढविण्याचे करावे. यासाठीच्या मार्गदर्शक सूचना (guidelines) हया खालीलप्रमाणे राहतील.

**क) जलबांधाची जागा निश्चिती :-**

१) जलबांधासाठी जागा निवडताना नदी/नाल्याचे पात्र (तळ) समतल असावे.

२) नदी/नाल्याचा उतार अधिक तीव्र असू नये.

३) गावाजवळ/गावाच्या वरील वा खालील बाजूस अथवा ज्या ठिकाणी लाभधारकाचा / शेतकऱ्याचा सहभाग मिळेल अशाच ठिकाणी बांधकामाचे स्थान निश्चित करावे. नाला/नदी त्या लांबीत सरळ असावेत व काठ मजबूत व कठीण असावेत.

४) पायासाठी उघडा खडक व स्थिर तीर जेथे असेल त्या ठिकाणास प्राधान्य द्यावे.

५) नदी/नाल्याचा काठ किमान २.०० मी. उंच असावा.

६) नदी/नाल्याच्या उगमापासून संगमा पर्यंत बुडित क्षेत्रानुसार जलबांध साखळी तयार होईल अशा त-हेने जागा निश्चिती करुन नियोजन करावे.

७) जलबांधामुळे वरील बाजूस असलेले रस्ते / बांधकाम व इतर बाबी बुडित होणार नाहीत याची खात्री करावी.

८) लाभक्षेत्रातील शेतक-यांची स्वखर्चाने उपसा सिंचन अनुसरण्याची तयारी असावी. बंधा-याच्या वर दोन्ही बाजूस नदी काठावर सिंचनासाठी विहिरी असणे अधिक चांगले.

९) जिथे जागा निवडली जाईल तेथील लाभधारक/शेतकरी यांच्या पाणी वापर संस्थेची जलबांधाची सुरक्षा व व्यवस्थापन यासाठी समती असावी.

**ख) भूसंपादन:-**

१) जलबांधाची जागा निश्चित करतांना बुडित क्षेत्रात कुठलीही खाजगी जमिन येत नसल्याबाबत खात्री करावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र सक्षम अधिका-यांनी द्यावे.

**ग ) अंदाजपत्रक :-**

१) जलबांधाची मुख्य भिंत व फ्लॅंक वॉल याचे बांधकाम एम-१० संधानकात करावे.

२) पाणी अडविण्यासाठी २.००X१.२० आकाराची लोखंडी द्वारे वापरावीत. बंधा-याची उंची १.२ मीटरला सिमित ठेवावी व waterway मध्ये शक्यतो encroachment नसावी.

३) ज्याच्या आधाराने दरवाजे उभे केले जातात त्या लोखंडी स्तंभाचा आकार २५० मिमी.x१२५ मिमी. एवढा असावा.

४) सर्व लोखंडी द्वारे वरच्या बाजूस (U/S) उघडतील व एक द्वार पूराचे पाणी सहज रित्या सोडण्यासाठी खालच्या बाजूस (D/S) उघडेल.

५) प्रत्येक दहा द्वारामागे किमान एक द्वार आकस्मिक पूराच्या पाण्यासाठी असावे व ते काठाच्या लगत व गावाकडील/शेताकडील बाजूस असावे.

६) अंदाजपत्रक प्रचलीत शासन नियमाचे पालन करुन पाटबंधारे व सा.बां. विभागाच्या दरसूचीप्रमाणे (फॅब्रिकेशनसह) करावे व अनुभवी गुत्तेदाराला निविदेच्या माध्यमातून निवडून त्याच्या कडून काम करुन घ्यावे.

**घ) बांधकाम:-**

१) जलबांध जास्तीत जास्त २ महिन्यात पूर्ण करण्याच्या दृष्टीने नियोजन करावे.

२) फॅब्रिकेशनचे काम सा.बां.वि.च्या रेड बुकमध्ये दिलेल्या स्टॅंडर्ड स्पेसिफिकेशन प्रमाणे कमीत कमी किमतीत करुन घ्यावे.

३) जलसंधारणाचे काम हे जलसंधारण विभागाच्या ल.पा.(स्थानिक स्तर) या यंत्रणेकडून राबविले जाईल.

**ङ.) व्यवस्थापन:-**

१) जलबांधाचे व्यवस्थापन शेतक-यांच्या/लाभधारकांच्या पाणी वापर संस्थेकडूनच (शासकीय/ ग्रामपंचायत वा अशासकीय) करुन घ्यावे. संबंधित गुत्तेदाराकडून सुरवातीचे एक वर्ष देखमाल व व्यवस्थापन करुन घेऊन तदनंतर व्यवस्थापनासाठी लाभधारकांच्या संस्थेस जलबांध हस्तांतरित करावेत.

२) हया बंधा-याचे दरवाजे दोन व्यक्ती सहजपणे हाताळू शकतात व हे काम लाभधारक संस्था स्वत: करु शकतात. तसेच अशा बंधाऱ्याच्या मागे गाळ पण साठत नाही. त्यामुळे व्यवस्थापनासाठी जास्तीचा खर्च होणार नाही.

३) शेतक-यांना सदर बांध हस्तांतर करतांना खालील बाबींवर लक्ष केंद्रित करण्याबाबत करारनाम्यात नमूद करावे.

अ) पावसाळ्यापूर्वी सर्व दरवाजे वरच्या बाजूस पाडावेत व आपत्कालिन दरवाजे खालील बाजूस पाडावेत.

ब) पावसाचा व पुराचा जोर कमी झाला की पाण्याच्या प्रवाहाचा अंदाज घेऊन द्वारे उभी करावीत जेणेकरुन पाणी अडविण्यास सुरुवात होईल.

क) गरजे नुसार पूर्ण उंचीऐवजी काही प्रमाणात पाणी साठविण्याकरिता काही द्वारे उभी करावीत.

**च) खबरदारी :-**

१) जलबांधाचे काम पूर्ण झाल्यानंतर एक वर्ष कंत्राटदाराने आणि नंतर संबंधित लाभधारक यांनी त्याची देखभाल व व्यवस्थापन करावयाचे आहे. त्यामुळे लाभधारकांचा सहभाग यात खुप महत्वाचा आहे. आणि त्यासाठी जोपर्यंत जलबांधालगतच्या लाभधारक/शेतकरी यांच्या संस्थेचा देखभालीमध्ये पूर्ण सहभाग व सहमती मिळत नाही तोपर्यंत जलबांधाचे स्थळ निश्चित करु नये व बांधकाम करु नये.

२) या जलसाठ्यातून पंप लावून सरळ पाणी उचल करु देऊ नये.

**छ) पाणी पट्टी :** शासनाच्या प्रचलित नियमाप्रमाणे अशा बांधापासून लाभ मिळण-या लाभधारकाकडून/ संस्थेकडून पाणीपट्टी वसूल केली जाईल.

**ज) आर्थिक मापदंड-** कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-याच्या (१५० सघमी पेक्षा कमी साठा) प्रचलीत मापदंडाच्या ६०% मापदंड जलबांधास लागू राहील. ही कमाल मर्यादा असेल. प्रत्यक्षातील खर्च यापेक्षा कमी असेल.

**झ)** जलबांधाचे नियोजन, संकल्पचित्र, नकाशे, बांधकाम व व्यवस्थापन इ. बाबतच्या आवश्यक त्या तपशिलवार सूचना मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे(स्थानिक स्तर) , पुणे यांनी तात्काळ वितरित कराव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने .

( म. ग. रानडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत:-

१) मुख्यमंत्र्यांचे सचिव
२) मा. मंत्री , वित्त / कृषि / नियोजन / पाटबंधारे
३) मुख्य सचिव
४) अतिरिक्त मुख्य सचिव
५) प्रधान सचिव , नियोजन विभाग
६) प्रधान सचिव , वित्त विभाग
७) प्रधान सचिव , कृषि विभाग
८) प्रधान सचिव , पाटबंधारे विभाग
९) मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे.
१०) जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे).
११) मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
१२) सर्व विभागीय आयुक्त , महाराष्ट्र राज्य
१३) अधिक्षक अभियंता, ल.पा.(स्था.स्त.) मंडळ ( सर्व ).
१४) संचालक , मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन , पुणे
१५) सर्व मुख्य अभियंता , पाटबंधारे विभाग.